**मुख्य वनसंरक्षक व संचालक संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली यांच्याआस्थापनेवरील ७१ अस्थायी पदे सन २०१५-१६ मध्ये पुढे चालू ठेवण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : डब्ल्यूएलपी ०१.१५/प्र.क्र.१०/फ-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०५ फेब्रुवारी, २०१५.

**वाचावे :-**

१. शासन आदेश महसूल व वन विभाग क्रमांक एफएसटी-१३९१/प्र.क्र.४७४/फ-४, दिनांक ०२.०७.१९९४.
२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२/(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक :- ०४.१०.२००४.
३. शासन निर्णय क्रमांक एफएसटी-१९/०४/प्र.क्र.१०९/फ-४, दि.८.८.२००६.
४. शासन आदेश क्रमांक एमएफएस-१००९/७३१/प्र.क्र.१३३/फ-८, दिनांक:-०९.२०११.
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-७/आस्था/मुले/प्र.क्र.१७६/७८५/११-१२ दिनांक :- ११.१०.२०११.
६. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), ठाणे यांचे पत्र क्रमांक कक्ष-७(१)/१२/आस्था/११७६, दिनांक:- २७.०१.२०१४.
७. शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांक :- डब्ल्यूएलपी-०२.१४/प्र.क्र.५२/फ-१, दिनांक :- १३.०३.२०१४.
८. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-३/योजनेतर/प्र.क्र.२/२०१४-१५/१२९१, दि.१२.११.२०१४.

**शासन निर्णय :-**

संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली येथील ७१ अस्थायी पदे वरील अनुक्रमांक ७ येथील दिनांक १३.०३.२०१४ च्या शासन निर्णयान्वये सन २०१४-१५ या अर्थिक वर्षात दिनांक ०१.०३.२०१४ ते दिनांक २८.०२.२०१५ पर्यत चालू ठेवण्यासाठी शासनाची मंजुरी प्रदान करण्यात आली आहे.

२. संदर्भ क्रमांक ४ च्या शासन आदेश व संदर्भ क्रमांक ५ च्या पत्रान्वये मुख्य वनसंरक्षक व संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली यांच्या आस्थापनेवरील कार्यालय अधिक्षक हे १ पद श्रेणीवाढीने निर्माण झालेलेआहेवलिपिकाचे१पदकमीकरण्यातआलेलेआहे,याअनुषंगानेसदरयोजनेत्तरयोजनेतीलकार्यालय अधिक्षक-१ पद श्रेणीवाढीने निर्माण झालेले आहे.

३. संदर्भ क्रमांक १ च्या शासन आदेश व संदर्भ क्रमांक ६ च्या पत्रान्वये मुख्य वनसंरक्षक व संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली यांच्या आस्थापनेवरील नाईक हे १ पद श्रेणीवाढीने निर्माण झालेली आहेत व शिपाईचे १ पद कमी करण्यात आलेले आहे, या अनुषंगाने सदर योजनेत्तर योजनेतील नाईक-१ पद श्रेणीवाढीने निर्माण झालेले आहे व शिपाईचे १ पद कमी झालेले आहे.

४. आता सदर ७१ पदे चालू ठेवण्याबाबत अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी प्रस्तावित केल्याप्रमाणे उपरोक्त ७१ पदे सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात दिनांक ०१.०३.२०१५ ते दिनांक २९.०२.२०१६ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. सदर पदांचा तपशील सोबतच्या विवरणपत्रात देण्यात आलेला आहे.

५. सदर कालावधीमध्ये मंजूर पदांच्या आढाव्यास, तसेच सुधारीत आढाव्यास (नव्याने निर्माण केलेली पदे आकृतीबंधात समाविष्ट करून) उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्यात यावी.

६. या पदांच्या आस्थापनेवर होणारा खर्च २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेतर), ०१ वनीकरण, ८००(०१) इतर खर्च, (०१) (०२) वने उपवने (२४०६ ०६५९) या लेखाशीर्षाखाली सन २०१४-२०१५ या आर्थिक वर्षात उपलब्ध होणाऱ्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

७. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. असंक - १००४ / प्र.क्र.१२ /(भाग-२) /२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ०४.१०.२००४ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२०५१६२००५६८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

APTE ARVIND SHANKAR

Digitally signed by APTE ARVIND SHANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT,CID - 918010, postalCode=400032, st=Maharashtra, cn=APTE ARVIND SHANKAR
Date: 2015.02.05 16:28:19 +05'30'

(अरविंद आपटे)
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग.

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर,

२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर,

३) अपर मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर,

४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम, मुंबई

५) मुख्य वनसंरक्षक व संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली, मुंबई.

६) महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,

७) फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवड नस्ती ).

**शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक डब्ल्यूएलपी ०१.१५/प्र.क्र.१०/फ-१,**
**दिनांक :- ०५ फेब्रुवारी, २०१५ सोबतचे विवरणपत्र**

---

**(दिनांक ०१.०३.२०१५ ते २९.०२.२०१६ या कालावधीसाठी मुदतवाढ दिलेली पदे)**

| अ.क्र. | पदनाम | पदनाम |
|---|---|---|
| १ | मुख्य वनसंरक्षक व संचालक | १ |
| २ | सहायक वनसंरक्षक | १ |
| ३ | अधीक्षक सिंहविहार | १ |
| ४ | वनक्षेत्र सर्व्हेक्षक | १ |
| ५ | कार्यालय अधीक्षक | १ |
| ६ | वनपाल व मुख्य प्राणी रक्षक | ९ |
| ७ | वाहन चालक | २ |
| ८ | वनरक्षक | ३२ |
| ९ | लिपिक | ६ |
| १० | चौकीदार | ४ |
| ११ | गँगमन | १ |
| १२ | क्लिनर | १ |
| १३ | वॉचमन | ६ |
| १४ | नाईक | १ |
| १५ | शिपाई | ४ |
| **एकूण अस्थायी पदे** | | **७१** |

******